**वनशेती उप अभियानाचा सन २०१८-१९ चा अनुसूचित जमाती प्रवर्गाचा अखर्चित निधी पुनरुज्जीवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वनशेती-०७१९/प्र.क्र.१८७(भाग-३)/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २१ नोव्हेंबर, २०१९

संदर्भ :-

१. केंद्र शासनाचे पत्र क्र.E-१०/२०१८-SMAF, दिनांक -२९ एप्रिल, २०१९.
२. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र/कृ.आ/फलो-२/वनशेती/नि.वि./७८९/१९,दि.४.७.२०१९.
३. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.८नोव्हेंबर, २०१९.

प्रस्तावना :-

सन २०१७-१८ या वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उप-अभियान राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. सन २०१८-१९ या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु.२०० लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी रु.३५.९४ लक्ष एवढा निधी आर्थिक वर्षा अखेर अखर्चित राहिला. सदर निधीचा कार्यक्रम सन २०१९-२० या वर्षात राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२९ एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अनुक्रमे रुपये रु.१२.३१, रु.१३.३९ व रु.१०.२४ लक्ष एवढया निधीचा समावेश आहे. पुनर्जिवित निधीपैकी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा अखर्चित निधी रु.१०.२४ लक्ष व समरुप राज्य हिश्श्याचा रु.७.०७ लक्ष असा एकूण रु.१७.३१ लक्ष निधी आयुक्त (कृषी) यांना बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

१. वनशेती उप अभियानांतर्गत सन २०१८-१९ या वर्षातील अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.१०.२४ लक्ष (रुपये दहा लक्ष चोवीस हजार फक्त) व समरुप राज्य हिस्सा रु.७.०७ लक्ष (रुपये सात लक्ष सात हजार फक्त) असा एकूण रु.१७.३१ लक्ष (रुपये सतरा लक्ष एकतीस हजार फक्त) एवढा निधी चालू आर्थिक वर्षात पुनर्जिवित करुन अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील  लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० च्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| **केंद्र** | **राज्य** |
|---|---|
| मागणी क्र.टी-५<br>२४०१,पीक संवर्धन<br>७९६ जनजाती उप योजना<br>०१ जनजाती क्षेत्र उप योजनेंतर्गत योजना<br>(०१)(३३) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - वन शेती उप अभियान (केंपुयो) (आक्षेपुयो)<br>(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ए८४२),<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्र.टी-५<br>२४०१,पीक संवर्धन<br>७९६ जनजाती उप योजना<br>०१ जनजाती क्षेत्र उप योजनेंतर्गत योजना<br>(०१)(३४) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - वन शेती उप अभियान (केंपुयो) (आक्षेपुयो)<br>(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ए८५१),<br>३३ अर्थसहाय्य |

३. सदर निधीचे आहरण व संवितरण करण्यासाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हा स्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

४. अनुदानची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

५. सदर निधी फक्त अनुसूचित जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांसाठी खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या वनशेती उप-अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपद्धती अनुसरुन, सर्व वित्तीय कायदे/ नियमांचे/ प्रकियेचे व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाचा वा परिपत्रकाचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

८. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

९. सदर निधी आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन अनु.क्र.३ च्या शासन निर्णयान्वये व वित्त विभागाने त्यांचा अनौचारिक संदर्भ क्र.२३५/२०१९/व्यय-१, दि.९ सप्टेंबर, २०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२११५११०३३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.11.21 15:14:01 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. आदिवासी आयुक्त, नाशिक.
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१२. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१५.वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२.
१६.निवड नस्ती (कार्यासन -१४अे)